सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या पदावर सरळसेवा भरतीने नियुक्ती करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन आदेश क्र.ससेनि-१३२४/प्र.क्र.४०/नापु.१५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक २७ मार्च, २०२५.

**संदर्भ :-** महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१४७७ (२)/२०२२/वीस, दि.२५.१०.२०२४

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधिन पत्रान्वये नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) पदावर नियुक्तीकरिता गुणवत्ता क्रमानुसार श्री. प्रदिप अशोकराव काळे (खुला) व कु. प्रतिक्षा विजय पवार (खुला-महिला) यांची शिफारस (जाहिरात क्र.०९९/२०२२) केली आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या शिफारशीनुसार त्यांची सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती व पदस्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. शासनाच्या प्रचलित नियमानुसार श्री. प्रदिप अशोकराव काळे(खुला) व कु.प्रतिक्षा विजय पवार (खुला-महिला) यांची वैद्यकिय मंडळाकडून तपासणी करण्यात आलेली आहे. सामान्य प्रशासन विभागाने चारित्र्य व पूर्वचारित्र्य याची पडताळणी करण्याबाबत जारी केलेल्या शासन निर्णय दि.२८.०८.२०१७ नुसार सदर उमेदवारांचे चारित्र्य पडताळणी संबंधित पोलीस आयुक्त / पोलीस अधिक्षक कार्यालयांकडून करुन घेण्यात आली आहे.

३. श्री.प्रदिप अशोकराव काळे (खुला) व कु. प्रतिक्षा विजय पवार (खुला-महिला) यांची सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या पदावर (वेतनस्तर एस-१७ : ४७६००-१५११००) महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ मधील नियम-९ (४३) मध्ये विहित केलेल्या परिविक्षाधीन या संज्ञेच्या व्याख्येनुसार नागरी सेवा मंडळाच्या शिफारशीस अनुसरुन तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

४. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या संदर्भाधिन पत्रान्वये शिफारस केलेल्या ०३ उमेदवारांपैकी श्री. प्रदिप अशोकराव काळे व कु. प्रतिक्षा विजय पवार हे उमेदवार प्रथम व व्दितीय स्थानी आहेत.

५. सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) (एस-१७ : ४७६००-१५११००) या पदावर नियुक्तीनंतर सदर उमेदवारांची पदस्थापना खालील तक्त्यात त्यांच्या नावासमोरील स्तंभ-३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे राहील :-

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील रिक्त पदावर पदस्थापना |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १. | श्री.प्रदिप अशोकराव काळे | सहायक नियंत्रक शिधावाटप, फ परिमंडळ, ठाणे |
| २. | कु. प्रतिक्षा विजय पवार | सहायक नियंत्रक शिधावाटप, प्रधान कार्यालय (आस्थापना), मुंबई. |

६. श्री.प्रदिप अशोकराव काळे (खुला) व कु. प्रतिक्षा विजय पवार (खुला-महिला) यांची सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब या पदावरील नियुक्ती २ वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पुर्ण करण्याच्या अधीन राहील.

७. उपरोक्त तक्त्यात नमूद उमेदवारांनी या शासन आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या कालावधीत नियुक्ती स्वीकारणे आवश्यक आहे. विहीत मुदतीत नियुक्ती न स्वीकारल्यास आयोगाने घेतलेल्या परिक्षेत

मिळविलेल्या गुणानुक्रमानुसार अनुज्ञेय असलेली जेष्ठता त्यांना मिळणार नाही. तसेच, प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांच्याकडून काहीही न कळविण्यात आल्यास या विभागाच्या निवड यादीवरुन त्यांचे नांव कोणतीही पूर्वसूचना न देता काढून टाकण्यात येईल, याची त्यांनी नोंद घ्यावी.

८. श्री.काळे व कु. पवार यांनी त्यांच्या नियुक्तीच्या पदावर रुजू होण्यासाठी नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई या कार्यालयात उपस्थित रहावे. त्यांची नियुक्ती या शासन आदेशासोबत जोडलेल्या सहपत्रांमध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

९. सदर उमेदवार सेवेत हजर होतील, त्याबाबतचा रुजू अहवाल नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांनी शासनाला तात्काळ सादर करावा.

१०. याप्रित्यर्थचा होणारा खर्च "मागणी क्र. एम-२, २४०८- अन्न साठवण व वखार साठवण, १०१ प्रापण व पुरवठा (०२) शिधावाटप (०२) (०१), मुंबई शिधावाटप क्षेत्र, दत्तमत (२४०८ ००६४), ०१ वेतन" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

११. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक २०२५०३२७१५०७४७६४०६ असा आहे सदर .आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by RAMCHANDRA KONDIBA DHANAWADE
Date: 2025.03.27 15:08:44 +05'30'

**(रामचंद्र धनावडे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. श्री. प्रदिप अशोकराव काळे, प्रभावती निवास, जगदाळे चौक, पानगांव, ता. बार्शी, जि. सोलापूर-४१३ ४०३.
२. कु. प्रतिक्षा विजय पवार, मु.पो. शिंदी खुर्द, ता. माण (दहिवडी), जि. सातारा - ४१५ ५०३.

प्रत,

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव.
२) मा. उपमुख्यमंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३) मा. राज्यमंत्री (अ.ना.पु. व ग्रा.सं.), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र ½, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र ½, मुंबई/नागपूर.
८) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
९) सचिव, अ.ना.पु.व ग्रा.सं. वि., मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
१०) सर्व कक्ष अधिकारी, अ.ना.पु.व ग्रा.सं. वि., मंत्रालय, मुंबई.
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) सर्व संबंधित उमेदवाराची वैयक्तिक नस्ती.
१६) निवडनस्ती (ना.पु. १५)

**शासन आदेश, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,क्र.ससेनि-१३२४/प्र.क्र.४०/नापु.१५**
**दिनांक: २७ मार्च, २०२५ सोबतचे सहपत्र.**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या शिफारशीनुसार नामनिर्देशनाने नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या पदावरील नियुक्ती खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून करण्यात येत आहे :-

(१) सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या पदावरील नियुक्ती वेतनस्तर एस-१७ : ४१८००-१३२३०० व इतर भत्ते यामध्ये करण्यात येत आहे.

(२) उमेदवार विवाहीत असल्यास त्यास एकापेक्षा अधिक पती/पत्नी असू नयेत.

(३) त्यांचे वेतन व भत्ते महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ प्रमाणे निश्चित करण्यात येतील.

(४) त्यांची ज्येष्ठता नंतर निश्चित करण्यात येईल. तसेच राष्ट्रीय आणीबाणीच्या वेळी संरक्षण सेवेत काम करणाऱ्या व्यक्तींचा हक्क अबाधित ठेवण्यात येईल.

(५) श्री. प्रदिप अशोकराव काळे व कु. प्रतिक्षा विजय पवार यांनी मराठी (१०० गुण) विषयासह माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण केली असल्याने, त्यांना शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : मभाप-१०८७/१४/सीआर-२/८७/२०, दिनांक ३०/१२/१९८७ मधील तरतूदींनुसार एतदर्थ मंडळाची मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट आहे. कु. प्रतिक्षा विजया पवार यांनी हिंदी (१०० गुण) विषयासह माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण केली असल्याने, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : हिंभाप १०८३/१४४८/वीस, दि.१.१२.१९८४ मधील तरतूदींनुसार एतदर्थ मंडळाची हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट आहे. याबाबतची नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात येईल.

तसेच श्री. प्रदिप अशोकराव काळे यांनी हिंदी (१०० गुण) विषयासह माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण केली नसल्याने, शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक हिंभाप १०८३/१४४८/वीस, दिनांक १.१२.१९८४ मधील तरतुदींनुसार एतदर्थ मंडळाची हिंदी भाषा परीक्षा रुजू झाल्याच्या दिनांकापासून २ वर्षाच्या आत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे, अन्यथा त्यांची वेतनवाढ रोखण्यात येईल.

(६) सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या पदावर नामनिर्देशनाने नियुक्त होणाऱ्या उमेदवाराकडे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९.०३.२००३ मधील तरतूदीनुसार (अ) D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत C.C.C. किंवा O स्तर किंवा B किंवा C स्तर पैकी कोणतीही एक परिक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा (ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र यापैकी एक प्रमाणपत्र किंवा माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : मातंस २०१२/प्र.क्र.२७७/३९, दि. ४.०२.२०१३ व शासन पूरकपत्र क्र. मातंसं २०१२/प्र.क्र.२७०/३९, दि.८.०१.२०१८ मध्ये नमूद केल्यानुसार आवश्यक संगणक अर्हता आवश्यक आहे. श्री. प्रदिप अशोकराव काळे यांनी इयत्ता माध्यमिक शालांत परिक्षेत (इयत्ता दहावी) माहिती तंत्रज्ञान विषय व उच्च माध्यमिक शालांत परिक्षेत (इयत्ता बारावी) संगणक शास्त्र विषय घेऊन उत्तीर्ण झाले आहेत. त्यामुळे त्यांना संगणक अर्हता परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येत आहे. तसेच कु.प्रतिक्षा विजय पवार यांनी MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र सादर केल्यामुळे त्यांना संगणक अर्हता परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येत आहे. याबाबतची नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

(७) शासन सेवेत असताना श्री. काळे व कु. पवार यांना खाजगी व्यवसाय करता येणार नाही किंवा आर्थिक लाभाचे कामही करता येणार नाही.

(८) श्री. काळे व कु. पवार यांनी नोकरी सोडताना शासनास एक महिन्याची पूर्व सूचना देणे आवश्यक आहे. पूर्वसूचना न दिल्यास, त्यांच्याकडून एक महिन्याचे वेतन वसूल करण्यात येईल.

(९) उमेदवाराने नियुक्तीचे आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत सेवेत रुजू होणे आवश्यक आहे. जर सदर पदावर रुजू होण्यास मुदतवाढ आवश्यक असेल तर तशी शासनाकडून लेखी

पूर्व परवानगी घेणे बंधनकारक आहे. उपरोक्त मुदतीत उमेदवार सेवेत रुजू झाले नाहीत, तर त्यांची सेवा ज्येष्ठता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या गुणवत्ता क्रमानुसार रहाणार नाही.

(१०) परिविक्षाधिन कालावधीत संबंधित उमेदवार सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या पदासाठी कामाचा अपेक्षित दर्जा साध्य करु शकले नाहीत, तसेच त्यांची वर्तणूक असमाधानकारक किंवा अशोभनीय आढळल्यास त्यांची सेवा समाप्त करण्यात येईल.

(११) परिविक्षाधीन कालावधीत किरकोळ रजांव्यतिरिक्त कोणतीही रजा अनुज्ञेय नाहीत. परिविक्षाधीन अधिकारी अनाधिकृत गैरहजर राहील्यास किंवा वैद्यकिय कारणाच्या सबबीखाली रजा घेऊन राज्य लोकसेवा / केंद्रीय लोकसेवा परीक्षांची तयारी / परीक्षा देत असल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित परिविक्षाधीन अधिकाऱ्याची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

(१२) उमेदवारास सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या पदावर नियुक्तीच्या दिनांकापासून राज्य शासकीय गट विमा योजना, १९८२ चे सदस्य म्हणून दाखल करुन घेण्यात येत आहे. गट विमा योजनेच्या नियमानुसार त्यांची गट विमा योजनेची वर्गणी नियुक्तीच्या दिनांकापासून वजाती करण्यात यावी.

(१३) सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या पदावर नियुक्ती दिलेल्या उमेदवाराने

(i) त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत स्वग्राम घोषित करावे.

(ii) नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना /राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत निवृत्तीवेतन, गटविमा योजना इत्यादीसंबंधीची नामनिर्देशन पत्रे त्वरित सादर करावीत.

(iii) मालमत्ता व दायित्व यासंबंधीची प्रपत्रे त्वरित भरुन द्यावीत.

(१४) सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या पदावर नियुक्ती दिलेल्या उमेदवाराने आता प्रथमच शासन सेवेत प्रवेश केला असल्याने शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अंतियो १००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१/१०/२००५ अनुसार त्यांना, "नवीन परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना" लागू राहील.

(१५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अंनियो १००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१/१०/२००५ अन्वये सहायक नियंत्रक शिधावाटप, राज्य सेवा गट-ब यांना "नवीन परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना" लागू ठरेल याकरिता त्यांनी सदर शासन निर्णयातील परिच्छेद ३ (ड) नुसार विकल्प त्वरित सादर करावा. मात्र सध्या अस्तित्वात असलेली निवृत्ती वेतन योजना म्हणजेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन नियम,१९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ ) आणि सध्या अस्तित्वात असलेली सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना त्यांना लागू होणार नाही.

(१६) नियुक्ती दिलेल्या उमेदवारांपैकी जे उमेदवार अगोदरच शासन सेवेत कार्यरत आहेत, त्यांची सध्याची वर्तणूक अशोभनीय असल्याचे भविष्यकाळात निदर्शनास आल्यास, त्यांची नियुक्ती कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

(१७) खुल्या प्रवर्गातील महिलाकरीता आरक्षित असलेल्या पदावरील निवडीकरीता खुल्या प्रवर्गातील महिला तसेच मागास प्रवर्गातील महिलांनी नॉन-क्रिमीलेयर प्रमाणपत्र सादर करण्याची अट महिला व बाल विकास विभागाच्या दि. ०४.०५.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात आली आहे.

(१७) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक-सीबीसी-१०/२००४/ प्र.क्र.५७०/मावक-५, दिनांक १६ मे, २००७ नुसार खुल्या प्रवर्गातून शासकीय सेवेत नियुक्त झालेल्या मागासवर्गीय उमेदवाराने त्यांच्या नियुक्तीनंतर कालांतराने मागासवर्गीय आरक्षणाचे फायदे मिळविण्यासाठी जर जाती प्रमाणपत्रासह अर्ज केला असेल तर त्या उमेदवाराने ज्या तारखेला जातीचे प्रमाणपत्र कार्यालयाकडे सादर केले आहे त्या तारखेपासून पुढे आरक्षणाचे फायदे जातीच्या दाव्याची वैधता तपासून झाल्यावर देय ठरतील. (भूतलक्षी प्रभावाने लाभ देय ठरणार नाहीत.)

(१८) संबंधित उमेदवारांनी अस्थायी नियुक्ती स्विकारण्यासाठी लागणारा प्रवास खर्च तसेच निवासस्थानाची व्यवस्था स्वत: करावयाची असून त्यासाठी मुदतवाढ दिली जाणार नाही.

(१९) सदर उमेदवार सेवेत हजर होतील त्याबाबतचा रुजू अहवाल नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

(२०) वरील उमेदवार ज्या दिवशी हजर होतील त्या दिनांकापासुन नियमाप्रमाणे त्यांचे वार्षिक कार्यमूल्यमापन अहवाल वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयानुसार लिहिण्यात येतील.

(२१) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र.निशिका-१२००/प्र.क्र.३९४४/नापु.१५, दिनांक ०९.०४.२००७ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या व त्यात वेळोवेळी सुधारणा करण्यात आलेल्या सहायक नियंत्रक शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या पदावरील नियुक्तीसंदर्भातील सेवा प्रवेश नियमातील तरतुदी लागू राहतील.

-----------------